प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमांतर्गत शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून शैक्षणिक प्रगती चाचण्यांच्या आयोजनाबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्र. शैगुवि २०१७/(११७/१७)/एस.डी.-६**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १४ जुलै, २०१७.

**वाचा:- शासन निर्णय- शैगुवि २०१५/(८०/१५)/एस.डी.६, दिनांक २२ जून, २०१५**

**शासन परिपत्रक-**

वाचन, लेखन, संख्याज्ञान आणि संख्यावरील क्रिया या क्षमतांची संपादणूक, प्रभुत्त्व पातळीकडे जाण्यासाठी आवश्यक ठरते. या मुलभूत क्षमतांची परिपूर्ण तयारी झाल्यास ज्ञानग्रहण आणि आकलनाचा मार्ग सुलभ होतो. त्याकडे दुर्लक्ष झाल्यास शैक्षणिक गुणवत्ता कमी राहते. सुरुवातीच्या इयत्तामध्ये विद्यार्थ्यांची संपादणूक कमी असल्यास पुढील इयत्तामध्येही ती सातत्याने कमीच राहते. अशा प्रकारे प्रगत विद्यार्थी व अप्रगत विद्यार्थी यांच्यामधील दरी इयत्तेनुसार वाढत जाते. हे विचारात घेऊन वाचन, लेखन, संख्याज्ञान आणि संख्यांवरील क्रियांमध्ये राज्यातील सर्व विद्यार्थी प्रगत होतील यासाठी संपूर्ण राज्यात प्रत्येक विद्यार्थ्यांच्या मूलभूत क्षमतांमधील संपादणूकीची नियमित पडताळणी करुन शैक्षणिक दर्जा उंचावण्यासाठी गरजाधिष्ठित कृतीकार्यक्रमाची आखणी करणे आवश्यक आहे. त्याचबरोबर ज्या इयत्तेत विद्यार्थी शिकत आहे त्या इयत्तेच्या क्षमतांचीही संपादणूक वेळच्या वेळी तपासून व मदत करुन अप्रगत विद्यार्थ्यांची संख्या कमी करीत जाणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम (PSM) राज्यामध्ये सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून सुरु करण्यात आला.

दोन वर्षापासून सर्व व्यवस्थापनांच्या, सर्व माध्यमांच्या शाळेमधील इयत्ता पहिली ते आठवीच्या सर्व विद्यार्थ्यांसाठी प्रथम भाषा व गणित विषयासाठी वर्षभरात तीन चाचण्यांचे आयोजन करण्यात आले. सन २०१६-१७ ची तीनही चाचण्यातील विद्यार्थ्यांच्या एकूण गुणांची नोंद सरल प्रणालीमध्ये करण्यात आली.
त्यानुसार राज्यातील विद्यार्थ्यांची (इयत्ता १ली ते ८वी) सरासरी संपादणूक टक्केवारी तसेच इयत्ता पाचवीसाठी NAS (National Achievement Survey), SLAS (State Level Achievement Survey), ASER(Annual Status of Education Report) मधील विद्यार्थ्यांची सरासरी संपादणूक पुढीलप्रमाणे आहे-

| विषय | PSM चाचण्या २०१६-१७ (इयत्ता पहिली ते आठवी) | NAS २०१५ (इयत्ता पाचवी) | SLAS २०१३-१४ (इयत्ता पाचवी) | SLAS २०१४-१५ (इयत्ता पाचवी) | ASER २०१६ (इयत्ता पाचवी) |
|---|---|---|---|---|---|
| भाषा | ७१.०५ (पायाभूत)<br>७७.१३ (संकलित २) | २४८<br>(देश २४१) | ५३.४८ | ५६.१४ | ६२.५ (वाचन) (देश ४७.८) |
| गणित | ७३.०३ (पायाभूत)<br>७७.०५ (संकलित २) | २३७<br>(देश २४१) | ५०.७६ | ४४.८९ | ४९.६ (वजाबाकी) (देश ५०.५)<br>२०.३ (भागाकार) (देश २५.९) |

PSM चाचणीमध्ये प्रथम भाषा विषयात वर्षभरात ६.०८% तर गणित विषयात ४.०२% वाढ झालेली दिसून येते. तथापि सदर वाढ ही एकूण गुणांच्या आधारे काढलेली आहे. मूलभूत क्षमतांमध्ये (वाचन, लेखन, संख्याज्ञान व संख्यांवरील क्रिया) यामधील संपादणूक नेमकी किती आहे हे लक्षात येत नाही. NAS मध्ये राज्यातील विद्यार्थ्यांची संपादणूक भाषा विषयामध्ये देशाच्या सरासरी संपादणूकीपेक्षा जास्त आहे, तर गणितामध्ये कमी आहे. SLAS मध्ये राज्यातील विद्यार्थ्यांची संपादणूक "भाषा" विषयामध्ये मागील वर्षीच्या संपादणूकीपेक्षा वाढलेली दिसते तर गणितामध्ये कमी झालेली आहे. ASER मध्ये राज्यातील विद्यार्थ्यांची संपादणूक "भाषा" विषयामध्ये देशाच्या सरासरी संपादणूकीपेक्षा जास्त आहे तर गणितामध्ये कमी आहे.

प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमाच्या शासन निर्णयानुसार एप्रिल, २०१७ पर्यंत १००% विद्यार्थ्यांना मूलभूत क्षमता प्राप्त होणे हे उद्दिष्ट होते. तथापि वरील विश्लेषणानुसार हे उद्दिष्ट प्राप्त झाल्याचे दिसून येत नाही.

मा. मुख्यमंत्री महोदय यांनी विभागाला दिलेल्या KRA(Key Result Area) नुसार राष्ट्रीय पातळीवरील विविध संस्थांच्या मूल्यमापनात महाराष्ट्राचा देशात प्रथम तीन क्रमांकामध्ये समावेश करणे हे उद्दिष्ट दिले आहे. सध्या राष्ट्रीय पातळीवर NCERT, नवी दिल्ली या संस्थेद्वारे राष्ट्रीय संपादणूक सर्वेक्षण - NAS (National Achievement Survey) आणि प्रथम या स्वयंसेवी संस्थेद्वारे ASER (Annual Status of Education Report) ही दोन मूल्यमापने होत आहेत.

वरील उद्दिष्टांच्या अनुषंगाने काम करताना शैक्षणिक प्रगती चाचणीचे स्वरुप, आयोजन, विद्यार्थी गुणांची नोंद करण्याची पद्धती, मूलभूत क्षमतांवर भर या बाबींमध्ये येत्या शैक्षणिक वर्षापासून काही बदल करण्यात येत आहेत. जेणेकरुन प्रत्येक विद्यार्थ्यांने मूलभूत क्षमता तसेच वयोगटानुरुप अपेक्षित क्षमता प्राप्त केली आहे किंवा नाही याची तपासणी शैक्षणिक प्रगती चाचण्यांद्वारे करुन ज्या विषयामध्ये / क्षमतेमध्ये विद्यार्थ्यांना अडचणी असतील त्यासाठी कृतीकार्यक्रम आखून अंमलबजावणी करणे सोपे होईल आणि प्रत्येक विद्यार्थी प्रभुत्त्व पातळीकडे वाटचाल करु शकेल.

**प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमांतर्गत शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून शैक्षणिक प्रगती चाचण्यांच्या आयोजन** पुढीलप्रमाणे करण्यात येईल.

१. **शैक्षणिक प्रगती चाचण्यांचे स्वरुप -**

१.१. सर्व व्यवस्थापनाच्या सर्व माध्यमांच्या शाळांमधील इयत्ता पहिली ते आठवीच्या सर्व विद्यार्थ्यांसाठी वर्षभरात तीन शैक्षणिक प्रगती चाचण्यांचे आयोजन करण्यात येईल.

१.२. **चाचणी १** - पायाभूत चाचणी (मूलभूत क्षमता व मागील इयत्तेपर्यंतच्या क्षमता)

**चाचणी २** - संकलित मूल्यमापन १ चाचणी (मूलभूत क्षमता व प्रथम सत्रापर्यंतच्या क्षमता)

**चाचणी ३** - संकलित मूल्यमापन २ चाचणी (मूलभूत क्षमता, प्रथम सत्रातील काही क्षमता व द्वितीय सत्रातील क्षमता)

१.३. **चाचणीचे विषय -** राष्ट्रीय संपादणूक सर्वेक्षण - NAS (National Achievement Survey) इयत्ता आठवीच्या अहवालानुसार गणित व विज्ञान या विषयांमध्ये आपल्या राज्यातील विद्यार्थ्यांची संपादणूक खूपच कमी असल्याचे आढळून आले आहे. त्यामुळे या वर्षीपासून इयत्ता सहावी ते आठवीसाठी चाचणीमध्ये विज्ञान विषयाचा समावेश केला आहे. इंग्रजी भाषेचे महत्त्व लक्षात घेता इयत्ता तिसरी ते आठवीसाठी इंग्रजी (तृतीय भाषा) या विषयाचा समावेश चाचणीमध्ये केला आहे. चाचणीचे विषय पुढीलप्रमाणे राहतील.

| इयत्ता | विषय |
|---|---|
| १ व २ | प्रथम भाषा व गणित |
| ३ ते ५ | प्रथम भाषा, गणित व इंग्रजी (तृतीय भाषा) |
| ६ ते ८ | प्रथम भाषा, गणित, इंग्रजी (तृतीय भाषा) व विज्ञान |

१.४.**मूलभूत क्षमता -** भाषा विषयात वाचन व लेखन आणि गणित विषयात संख्याज्ञान (ऐकून संख्या लिहिणे, संख्यांची तुलना, विस्तारीत रुप, स्थानिक किंमत), संख्यांवरील क्रिया (बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार)

यावर्षीपासून राज्यातील सर्व विद्यार्थ्यांची उपरोक्त मूलभूत क्षमतांमधील क्षमतानिहाय संपादणूक पाहिली जाईल. प्रथम भाषा व गणित विषयासाठी इयत्ता पहिली ते आठवी या सर्व इयत्तांसाठी वरील मूलभूत क्षमतांसाठी चाचणीमध्ये प्रश्न विचारण्यात येतील.

२. **प्रत्येक चाचणीनंतर विद्यार्थ्यांच्या गुणांची नोंद करण्याची पद्धती -**

२.१.सर्व विद्यार्थ्यांच्या प्रश्ननिहाय / क्षमतानिहाय नोंदीसाठी न्युपा, नवी दिल्ली यांनी App विकसित केले आहे. या App मध्ये ऑनलाईन तसेच ऑफलाईन विद्यार्थ्यांची गुणांची नोंद करता येईल. अशी नोंद केल्यावर निकाल ही लगेच मिळेल. यामुळे शिक्षकांना वर्गातील विद्यार्थ्यांची प्रश्ननिहाय / क्षमतानिहाय संपादणूक समजेल. तसेच सर्व विद्यार्थी कोणत्या क्षमतेमध्ये चांगले आहेत आणि कोणत्या क्षमतेमध्ये विद्यार्थ्यांची संपादणूक कमी आहे ते तात्काळ समजेल. विद्यार्थीनिहाय / क्षमतानिहाय कृती कार्यक्रम तयार करणे शिक्षकांना सोपे होईल. शिक्षकांनी ह्या App चा वापर केल्याने त्यांच्या विद्यार्थ्यांचे गुण आपोआप सरल प्रणालीमध्ये नोंदविले जातील. अशा प्रकारे App / संगणक प्रणालीमध्ये गुणांची नोंद केल्यावर वरीष्ठ कार्यालयाने कोणत्याही प्रकारची Hard Copy शिक्षकांकडून / शाळांकडून मागवू नये.

२.२.विद्यार्थ्यांच्या मूलभूत क्षमतांमधील संपादणूकीनुसार वाचन, लेखन, संख्याज्ञान, बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार या क्षमतांमध्ये एकूण गुणाच्या ७५% किंवा जास्त गुण मिळविणारे विद्यार्थी प्रगत विद्यार्थी समजले जातील.

२.३.ज्या शाळांमधील प्रत्येक विद्यार्थ्याला मूलभूत क्षमतांपैकी प्रत्येक क्षमतेमध्ये ७५% किंवा जास्त गुण असल्यास आणि एकूण गुणांपैकी ६०% पेक्षा जास्त गुण असल्यास ती शाळा प्रगत शाळा समजली जाईल.

३. **पर्यवेक्षकीय अधिकाऱ्यांची भूमिका व जबाबदाऱ्या** - शिक्षकांनी विद्यार्थ्यांचे योग्य पद्धतीने मूल्यमापन करणे आवश्यक आहे. मात्र कधी कधी वर्गातील विद्यार्थ्यांची संपादणूक आहे त्यापेक्षा वाढवून दाखवली जाते. तसेच कधी कधी वर्गातील विद्यार्थ्यांची संपादणूक आहे त्यापेक्षा कमी दाखवली जाते. असे दोन्ही प्रकार काही प्रमाणात मागील वर्षी आढळून आले. अशा प्रकारे कधी कधी शिक्षकांकडून विद्यार्थ्यांचे मूल्यमापन करताना चुका होतात किंवा त्यांना योग्य प्रकारे मूल्यमापन करता येत नाही. विद्यार्थ्यांची संपादणूक पातळी नेमकी किती आहे हे समजले तर त्या अनुषंगाने कृती कार्यक्रम तयार करुन त्याची अंमलबजावणी करण्यात येईल. यासाठी विद्यार्थी संपादणूकीबाबत योग्य निदान होणे आवश्यक आहे. यासाठी पर्यवेक्षकीय अधिकारी चाचणीच्या वेळेस प्रत्येक दिवशी एका शाळेवर

उपस्थित राहतील. तसेच चाचणीनंतरसुद्धा शाळा भेटी करुन मूलभूत व वर्ग पातळीवरील क्षमतांबाबत विद्यार्थी संपादणूकीची पडताळणी करतील.

३.१.प्रत्येक चाचणीच्या वेळेस, प्रत्येक दिवशी प्राचार्य, जेष्ठ अधिव्याख्याता, अधिव्याख्याता (जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था), शिक्षणाधिकारी, उपशिक्षणाधिकारी, गटशिक्षणाधिकारी, विस्तार अधिकारी, केंद्रप्रमुख यांनी शाळेची पूर्ण चाचणी स्वत: समोर करुन घ्यावी. या शाळेची चाचणी संबंधित अधिकाऱ्याने स्वत: घेतली आहे असे समजण्यात येईल. त्यामुळे उत्तरपत्रिका तपासून झाल्यावर ती योग्य तपासले गेल्याची शहानिशा सुद्धा करावी. हे कार्य त्याच दिवशी किंवा नंतरच्या एखाद्या आठवड्यात करता येईल.

३.२.सर्व शाळांमध्ये सर्व शिक्षकांद्वारे योग्य चाचण्या व मूल्यमापन व्हावे या उद्देशाने पायाभूत चाचणीच्या एका महिन्याच्या आत केंद्रप्रमुखांनी केंद्र संसाधन समूहाच्या मदतीने इयत्ता १ली ते ८वी च्या सर्व शाळांमधील सर्व विद्यार्थ्यांच्ये मूल्यमापन करुन खात्री करुन घ्यावे. असे मूल्यमापन करताना मूळ चाचणीमधील मूलभूत क्षमता तसेच वर्ग पातळीवरील क्षमतेबाबतच्या प्रश्नांच्या काठिण्यपातळीचे प्रश्न विचारावे.

३.३.विद्या प्राधिकरण पुनर्रचना शासन निर्णय.क्र. डायट-४५१६/प्र.क्र.४०/२०१६/प्रशिक्षण, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१६ मधील तरतुदीप्रमाणे केंद्र संसाधन समूह (CRG) तयार करावे. अर्थात या समूहामध्ये केंद्रातील प्रगत शाळेतील उत्कृष्ट कार्य करणारे शिक्षक राहतील.

३.४.केंद्रप्रमुखाने घेतलेल्या चाचणीतील गुणांच्या नोंदी करण्यासाठी सरल प्रणालीमध्ये सुविधा तयार करण्यात येईल. शिक्षकांनी चाचणी घेऊन केलेल्या नोंदी व केंद्रप्रमुखाने चाचणी घेऊन केलेल्या नोंदी यातील सारखेपणा / तफावत पाहण्यात येईल. संपादणूकीत २०% पेक्षा जास्त तफावत असलेल्या शिक्षकांना ज्ञापन देण्यात येईल. तसेच विद्यार्थी गुणवत्ता वाढीसाठी कालबद्ध उद्दिष्ट देण्यात येईल.

३.५.मात्र वरील दोघे मिळूनही योग्य प्रकारे मूल्यमापन करत नसतील तर यासाठी राज्यस्तरावरून तपासणीची व्यवस्था करण्यात येईल. तथापि या तपासणीचा उद्देश शिक्षकांच्या किंवा केंद्रप्रमुखांच्या चुका काढणे असा नसून मूल्यमापन करताना त्यांना येणाऱ्या अडचणी दूर करणे हा असेल. यासाठी विभागीय व राज्यस्तरीय संस्थेमधील यंत्रणेचा वापर करण्यात येईल. या संस्थांमधील प्रत्येक अधिकारी २ शाळा भेटी करतील.

३.६.अशा प्रकारे मूल्यमापनाची पडताळणी केल्यानंतर मूलभूत क्षमतेत ७५% पेक्षा कमी गुण आणि वर्ग पातळीवरील क्षमतेत ६०% पेक्षा कमी गुण असलेल्या विद्यार्थ्यांची विषयानिहाय व वर्ग निहाय यादी तयार करण्यात यावी. या मुलांना विशेष मदत करावयाची आहे. ती मुले प्रगत होईपर्यंत त्यांची दर महिन्याला चाचणी घ्यावयाची आहे.

३.७.अनियमित मुले प्रगत नसतील तर त्यांना सुद्धा या यादीत समाविष्ट करावयाचे आहेत. चाचणीच्या दिवशी गैरहजर राहणाऱ्या मुलांना शुन्य गुण देण्यात यावे. अन्यथा त्यांना शाळेत आणून अन्य दिवशी चाचणी घेऊन गुणदान करण्यात यावे.

३.८. मुले प्रगत झाल्यावर त्यांना मासिक चाचणीच्या यादीतून वगळण्यात यावे. नमूद करण्याची आवश्यकता नाही की मूले आधी मूलभूत क्षमतेत प्रगत होतील.

३.९ एकूण गुणांच्या बाबतीत सर्व विद्यार्थ्यांना ८०% पेक्षा जास्त गुण असणाऱ्या शिक्षकांना / शाळांना अभिनंदनाचे पत्र, ६०% पेक्षा जास्त गुण असणाऱ्या शिक्षकांना / शाळांना उत्तेजनार्थ पत्र

(गुणवत्ता वाढीसाठीच्या सूचनेसह), ४०% पेक्षा जास्त गुण असणाऱ्या शिक्षकांना / शाळांना विद्यार्थी संपादणूक अधिक उंचावण्यासाठी प्रेरीत करणारे पत्र तसेच काही विद्यार्थ्यांना ४०% पेक्षा कमी गुण असणाऱ्या शिक्षकांना / शाळांना कमी संपादणूकीची दखल घेऊन गुणवत्ता वाढीसाठी निश्चित उद्दिष्ट देणारे पत्र देण्यात येईल.

४. **चाचणी निकालाच्याआधारे नियोजनबद्ध गुणवत्ता विकासाचा कार्यक्रम** - शैक्षणिक प्रगती चाचणीचा मूळ उद्देश विद्यार्थ्यांची संपादणूक पातळी पाहून त्या आधारे विद्यार्थीनिहाय / क्षमतानिहाय संपादणूक पातळी उंचावणे हा आहे. या दृष्टीने शिक्षकांना आवश्यक सहाय्य केले जाईल.

४.१. सरल प्रणालीद्वारे चाचणीमधील विद्यार्थ्यांच्या (विद्यार्थ्यांचे व्यक्तिगत गुण वगळून) संपादणूकीबाबतचे सर्व अहवाल शिक्षक, पर्यवेक्षकीय यंत्रणा, अधिकारी, पालक व समाज या सर्वांसाठी उपलब्ध करुन दिले जातील. यामुळे विद्यार्थी संपादणूकीवर सर्वांचे लक्ष राहील. चांगली संपादणूक असणाऱ्या शाळा / केंद्र / तालुका / जिल्हा यांना समाजाचे अधिक सहकार्य सहजपणे मिळेल. कमी संपादणूक असणाऱ्या शाळा / केंद्र / तालुका / जिल्हा यांचेवर विद्यार्थी संपादणूक उंचावणेबाबतचे उत्तरदायीत्त्व वाढेल.

४.२.भाषा व गणित विषयासाठी प्रश्नपेढी तयार करुन MITRA App (Maharashtra In-service Teacher Recourse App) / विद्या प्राधिकरणाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येईल. या प्रश्नपेढीच्या आधारे मूलभूत व वर्ग पातळीवरील क्षमतांमध्ये जे विद्यार्थी मागे असतील त्यांची शिक्षकांनी महिन्यातून एकदा चाचणी घ्यावी व त्यांच्या गुणांबाबत / प्रगतीबाबत CRG (Cluster Recourse Group) ला कळवावे. तसेच इयत्तानुरुप इतर क्षमतांबाबत शिक्षक विद्यार्थ्यांची तयारी करतील. तसेच प्रश्नपेढीतील प्रश्नानुसार शिक्षक स्वत: तसे अजून प्रश्न तयार करुन विद्यार्थ्यांचा सराव करतील.

४.३. शिक्षक, मुख्याध्यापक, पर्यवेक्षक तसेच प्राचार्य, जेष्ठ अधिव्याख्याता, अधिव्याख्याता (जिल्हा शैक्षणिक सातत्यपुर्ण व्यावसायिक विकास संस्था), शिक्षणाधिकारी, उपशिक्षणाधिकारी, गटशिक्षणाधिकारी, विस्तार अधिकारी, केंद्रप्रमुख या सर्वांवर विद्यार्थी गुणवत्ता विकासाची जबाबदारी निश्चित व्हावी, यासाठी त्यांच्या वार्षिक कामकाजाचे मूल्यमापन करण्यासाठी PAR (Performance Appraisal Report) निर्गमित करण्यात येईल. सदर PAR मध्ये शिक्षक, मुख्याध्यापक, पर्यवेक्षक यांचेसाठी वर्गातील / शाळेतील विद्यार्थी संपादणूक आणि पर्यवेक्षकीय अधिकाऱ्यांसाठी त्यांच्या कार्यक्षेत्रामधील शाळा / विद्यार्थी यांची संपादणूक हे सर्वात महत्त्वाचे दर्शक असेल.

याप्रमाणे २०१७-१८ पासून सर्व संबंधितांनी शैक्षणिक प्रगती चाचण्यांची जबाबदारीने व नियोजनपूर्वक अंमलबजावणी करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०७१४१७१९३३८९२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.07.14 17:16:44 +05'30'

**( नंद कुमार )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत: माहितीस्तव,**

१.मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२.मा. विरोधी पक्षनेता, (विधानसभा/ विधानपरिषद), विधानभवन, मुंबई.
३.सर्व मा. विधानसभा सदस्य/ विधानपरिषद सदस्य, विधानभवन, मुंबई.
४.मा. मंत्री शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

**प्रत: माहिती व आवश्यक कार्यवाहीस्तव,**

१) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
२) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) आयुक्त, आदिवासी विकास विभाग, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४) आयुक्त, समाज कल्याण, पुणे.
५) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) संचालक, विद्या प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व विभाग)
९) प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व)
१०) शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण निरीक्षक, (दक्षिण / उत्तर / पश्चिम), बृह्नमुंबई.
१२) शिक्षण प्रमुख / शिक्षणाधिकारी / प्रशासन अधिकारी, महानगरपालिका / नगरपालिका (सर्व)
१३) निवड नस्ती (एसडी-६).